**श्रीमती सुप्रिया प्रभाकर थुल, सहायक संचालक,
नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांचा परिविक्षा
कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.पकानि-१५१७/४४५/प्र.क्र.७९/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
**दिनांक :- १३ एप्रिल, २०१७.**

पहा :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२१२/७०९/प्र.क्र.१३७/नवि-२७, दि.०४.०५.२०१३.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/गट-अ/ससंनर/ना.नि./प्रशा-१/२४४१, दि.०७.०५.२०१३.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/सुप्रथु-ससंनर/परिविक्षा/प्रशा-१ब/१२८१, दि.१०.०३.२०१७.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्रीमती सुप्रिया प्रभाकर थुल यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरिता सरळसेवेने नियुक्ती करण्यात येऊन सहायक संचालक, नगर रचना, गोंदिया शाखा, गोंदिया पदावर पदस्थापना करण्यात आली होती. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या संदर्भाधिन दि.०७.०५.२०१३ रोजीच्या कार्यकारी आदेशानुसार त्या दि.१५.०५.२०१३ (म.पू.) रोजी उक्त पदावर हजर झाल्या.

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन दि.१०.०३.२०१७ रोजीच्या पत्रान्वये श्रीमती सु. प्र. थुल, सहायक संचालक, नगर रचना यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०३.** श्रीमती सु. प्र. थुल, सहायक संचालक, नगर रचना यांचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.१५.०५.२०१३ (म.पू.) पासून सुरु होऊन, दि.१४.०५.२०१५ रोजी संपुष्टात येणे अपेक्षित होते. तथापि, त्यांनी परिविक्षा कालावधीत एकूण ०६ दिवसांची रजा उपभोगल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी दि.१४.०५.२०१५ पासून पुढे ०६ दिवसांनी वाढून दि.२०.०५.२०१५ रोजी संपुष्टात येईल. त्यानुषंगाने श्रीमती सु. प्र. थुल, सहायक संचालक, नगर रचना यांचा दोन परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या बाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्रीमती सुप्रिया प्रभाकर थुल, सहायक संचालक, नगर रचना, नागपून महानगरपालिका, नागपूर ह्या "सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" पदाच्या सेवाप्रवेश नियमातील अटी व शर्तींची तसेच इतर अनुषंगिक सेवाविषयक बाबींची पूर्तता करित आहेत. त्यांनी ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ३९ अपवाद १ (ए) (एक) मधील तरतुदीनुसार त्यांचा “सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)” (वेतनसंरचना पीबी-३, रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००) पदाचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.२०.०५.२०१५ (म.नं.) रोजी संपुष्टात आणण्यात येत येऊन दि.२१.०५.२०१५ (म.पू.) पासून उक्त पदावर नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

०२. सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक **२०१७०४१३१३२२३३११७२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.04.13 17:56:14 +05'30'

( ए. कि. सहाणे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

श्रीमती सुप्रिया प्रभाकर थुल, सहायक संचालक, नगर रचना, नागपूर महानगरपालिका, नागपूर यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(०३-प्रती)**
७. सह संचालक, नगर रचना, नागपूर विभाग, नागपूर.
८. सहायक संचालक, नगर रचना, नागपूर शाखा, नागपूर.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
११. सबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, -----------------.
१२. निवडनस्ती / नवि-२७.